**सन २०१८-१९ मध्ये विशेष केंद्रीय सहाय्य अंतर्गत मंजूर मुरादपूर सहकारी उपसा सिंचन योजना , ता-उमरेड,जि-नागपूर योजनेस प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विकेंस-२०१८/प्र.क्र.१००/का-१९**
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीखः १९/०१/२०१९

वाचा-

१) जनजातीय कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/०४/२०१८-Grants,दि.२१.०६.२०१८
२) जनजातीय कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/०१(१३)/२०१८-TSP , दि.२९.०६.२०१८ व दि.२७.०९.२०१८
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः केंद्रिय-२०१८/प्र.क्र.६९/का-१९ दि. १०/०९/२०१८ व दि.०५.११.२०१८
४) आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक यांचे पत्र क्र.विकेंस-२०१७/प्र.क्र.६४/का.८(५),दि.१०.०९.२०१८

प्रस्तावना -

केंद्र शासनाकडून वाचा क्र.१ वरील पत्रान्वये सन २०१८-१९ करिता विशेष केंद्रिय सहाय्य अंतर्गत मुरादपूर सहकारी उपसा सिंचन योजना ,ता-उमरेड,जि-नागपूर या योजनेकरीता रू.७१८.०० लक्ष निधी मंजूर आहे. त्यापैकी सन २०१८-१९ मध्ये रु.५००.०० लक्ष व सन २०१९-२० मध्ये रू.२१८.०० लक्ष इतका निधी प्राप्त होणार आहे. केंद्र शासनाकडून वाचा क्र.२ वरील पत्रान्वये सन २०१८-१९ करिता प्राप्त झालेला रू.५००.०० लक्ष इतका निधी वाचा क्र.३ वरील शासन निर्णयान्वये आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक यांना वितरीत केलेला आहे.

२. आयुक्त आदिवासी विकास नाशिक यांनी वाचा क्र.०४ वरील पत्रान्वये मुरादपूर सहकारी उपसा सिंचन योजना , ता-उमरेड,जि-नागपूर या योजनेकरीता प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव अंदाजपत्रकासहीत सादर केला आहे. मुरादपूर सहकारी उपसा सिंचन योजना ,ता-उमरेड,जि-नागपूर या योजनेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे मुरादपूर सहकारी उपसा सिंचन योजना ,ता-उमरेड,जि-नागपूर या योजनेच्या कामाप्रित्यर्थ रु. ७,१७,९८,५१०/-(रू. सात कोटी सतरा लक्ष अठ्ठयानव हजार पाचशे दहा फक्त) प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

वरील प्रमाणे प्रदान करण्यात येत असलेली प्रशासकीय मान्यता खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१. प्रकल्पदर्शक नकाशावर प्रकल्पाचे ठिकाण, लाभक्षेत्र इ. दर्शवून तो मुख्य अभियंता यांच्याकडून प्रमाणित करून घेण्यात यावा.
२. वेण्णा प्रकल्पातुन पाणी उचल करण्याचे नियोजित असल्याने संबंधित प्रकल्प यंत्रणेमार्फत पाणी उपलब्धतेबाबत ना हरकत प्रमाणपत्र प्राप्त करून घेण्यात यावे.
३. योजनेसाठी Pre Project and Post Project ची रचना जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी, नागपूर यांनी सद्यस्थितीतील मंजुर केलेली पीक रचना प्राप्त करण्यात यावी .

४. निविदा कार्यवाही अगोदर योजनेच्या स्थापत्य, यांत्रिकी व उर्जाविषयक उपांगाचे संकल्पनास/आराखड्यास सक्षम प्राधिकाऱ्याची मान्यता घेवून त्यानुसार अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करण्यात यावी.

५. सदरच्या प्रकल्पाचे काम उपलब्ध निधीच्या मर्यादेतच पूर्ण करण्यात यावे.

६. निधीची मंजुरी मिळाल्याशिवाय या योजनेच्या कामावर कोणत्याही प्रकारचा खर्च करू नये.

७. प्रस्तावित किंमतीच्या मर्यादेत योजनेचे काम पूर्ण करण्यात यावे.

८. ग्रामविकास व जलसंधारण विभाग,शासन निर्णय क्र.लपायो-१०९९/प्र.क्र.३४७/जल-१, दि. ३१ जुलै, २००० व मृद-जलसंधारण विभाग,शासन निर्णय क्र.लपायो-२०१८/प्र.क्र.१७६/जल-१, दि. २०.०७.२०१८ नुसार लाभधारकांची पाणी वापर संस्था स्थापन करण्यात यावी.

९. प्रकल्पाचे काम पूर्ण झाल्यावर सदर प्रकल्प देखभाल दुरूस्तीसाठी वरीलप्रमाणे स्थापित पाणीवापर संस्थेकडे हस्तांतरीत करण्यात यावा.

१०. वरीलप्रमाणे प्रकल्पाचे हस्तांतरण झाल्यानंतर देखील दुरूस्तीचा खर्च लाभार्थ्यांकडून करण्यात यावा.

११. ग्रामविकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र. नागरी २०११/ प्र.क्र. १९२/निधी जल-१ दि. २/२/२०१२ अन्वये निर्धारित तरतुदींचे काटेकोर अनुपालन करण्यात यावे.

१२. योजनेचे सिंचनक्षेत्र १६५ हे. प्रस्तावित असल्याने त्यानुसार गटनंबर निहाय लाभधारकांची यादी व नकाशा तांत्रिक मान्यतेपूर्वी सक्षम प्राधिकाऱ्याकडे सादर करावा.

१३. निविदा कार्यवाही अगोदर योजनेचा सर्वसाधारण आराखडा मध्यवर्ती संकल्पन चित्र संघटना, नाशिक किंवा शासनमान्य सक्षम संकल्पन करणारी यंत्रणा यांचेकडून तयार करून घेण्यात यावा.

१४. निविदा कार्यवाही अगोदर पंपग्रहाच्या स्थापत्य कामांची सविस्तर संकल्पचित्रे मध्यवर्ती संकल्पन चित्र संघटना, नाशिक किंवा शासनमान्य सक्षम संकल्पन करणारी यंत्रणा यांचेकडून तयार करून घेण्यात यावीत.

१५. निविदा कार्यवाही अगोदर उपसा सिंचन योजनेसाठी नियंत्रित केलेल्या पातळ्या, विसर्ग तसेच पंपांची संख्या, पंपाचे प्रकार, अश्वशक्ती व उर्ध्वगामी नलिका (व्यास, रांगा व जाडी ) इत्यादीचे मध्यवर्ती संकल्पन चित्र संघटना, नाशिक किंवा शासनमान्य सक्षम संकल्पन करणारी यंत्रणा यांनी तयार केलेली संकल्पने व ती क्षेत्रीय मुख्य अभियंता यांनी मंजुर केलेली असावी.

२. उपरोक्त खर्च मागणी क्र. टी-५, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, (०२)(४३) विशेष केंद्रीय सहाय्य अन्वये केंद्रीय सहाय्य (केंद्र योजना), ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) (२२२५ E०४२) यामधील सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पित असलेल्या निधीतून करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय मृद व जलसंधारण विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक अनौस-४२४७/जल-१, दि.२२/११/२०१८ अन्वये प्राप्त सहमतीने तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग- तीन , परीच्छेद (२)२७ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर योजनेची अंमलबजावणी यंत्रणा मृद व जलसंधारण विभाग राहील.या कामांची संपूर्ण निविदा प्रक्रिया प्रचलित कार्यपद्धती / नियमांचे काटेकोरपणे पालन करुन करण्यात यावी. तसेच अंमलबजावणी यंत्रणेने उपयोगिता प्रमाणपत्र ,आर्थिक व भौतिक अहवाल अपर आयुक्त,आदिवासी विकास,नागपूर यांच्यामार्फत शासनास विहित प्रपत्रात सादर करावे. प्रस्तुत काम पूर्ण झाल्यानंतर कामाच्या ठिकाणी सदरील काम केंद्रीय योजनेतून पूर्ण केले असल्याबाबतचा फलक लावण्यात यावा. सदर योजनेच्या लाभार्थ्यांची यादी व Geo-tagged photographs हे www.stcmis.gov.in/smis या वेबसाईट वर अपलोड करण्याची संयुक्त जबाबदारी प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,नागपूर व संबंधित अंमलबजावणी यंत्रणेची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११९१११०४३६२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajitsingh R Rajput

Digitally signed by Ajitsingh R Rajput
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=TDD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a614ce75be611413980d3efebe7cde81ad571ab119e8360b7b526b5159edd099, serialNumber=32168d31c7d800af039db3657f6a01d233033f3f7c16b7ca135b2c868025eb3e, cn=Ajitsingh R Rajput
Date: 2019.01.19 11:17:36 +05'30'

(अ.रा.राजपूत)
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१. मा.मंत्री ,आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
२. मा.राज्यमंत्री आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई
३. प्रधान सचिव,आदिवासी विकास यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई
४. प्रधान सचिव,वित्त विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई
५. सचिव, मृद व जलसंधारण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई
६. आयुक्त,आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य,नाशिक
७. सहसचिव/ उपसचिव,आदिवासी विकास,मंत्रालय,मुंबई
८. अपर आयुक्त,आदिवासी विकास,नागपूर
९. मुख्य अभियंता, लघूसिंचन (जलसंधारण) विभाग, पुणे.
१०. कार्यकारी अभियंता, लघूसिंचन (जलसंधारण) विभाग, नागपूर
११. प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,नागपूर.
१२. संगणक समन्वयक,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१३. निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई

**शासन निर्णय क्रमांकः विकेंस-२०१८/प्र.क्र.१००/का-१९,दि.१९.०१.२०१९**

**सोबतचे जोडपत्र -अ**

मुरादपूर सहकारी उपसा सिंचन योजना ,ता-उमरेड,जि-नागपूर या योजनेचा गोषवारा

| **अ.क्र** | **उपशिर्ष** | **सुधारीत प्रशासकीय मान्यतेसाठी प्रस्तावीत रूपये** |
|---|---|---|
| १) | **शिर्षकामे** | |
| I. | ए- प्राथमिक | ९,५०,०००/- |
| II. | बी- भूसंपादन | १,००,०००/- |
| III. | सी- कामे | २,४०,२६,०९१/- |
| IV. | डी- विमोचक | २,८२,८३५/- |
| V. | एम- वृक्षारोपण व लागवड | ५०,०००/- |
| VI. | ओ- संकीर्ण | ५०,०००/- |
| VII. | पी- देखभाल व दुरूस्ती | ५०,०००/- |
| VIII. | आर- दळणवळण | ४,३०,८९२/- |
| IX. | एच- टी एल टी ट्रान्सफॉर्मर | ९,००,१००/- |
| | मुख्य कालवा/रायझिंगमेन/वितरण प्रणाली | २,३९,३१,५४८/- |
| | ठिंबक सिंचन | २,१०,२७,०४४/- |
| | **एकुण** | **७,१७,९८,५१०/-** |